**राज्यात स्वयंअर्थसहाय्यीत विद्यापीठांची स्थापना करण्याची तरतुद करण्यासाठी, त्यांच्या कामकाजाचे व कार्याचे विनियमन करण्यासाठी आणि त्यांचेशी संबंधीत किंवा तद्नुषंगिक बाबींसाठी तरतुद करण्याकरीता सुधारित मार्गदर्शक सूचना.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांकः- संकीर्ण-२०१७/(१४४/१७)/विशि-४**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १९ जानेवारी, २०१९.

संदर्भ:- शासन निर्णय क्रमांक:- युएसजी २००६/(२५४/०६)/विशि-४/भाग-२, दिनांक २९ मे, २०१३.

**प्रस्तावना:-**

राज्यात स्वयं अर्थसहाय्यीत विद्यापीठांची स्थापना करण्यासाठी, शासन निर्णय दिनांक २९ मे, २०१३ अन्वये मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आल्या होत्या. या मार्गदर्शक सूचनांनुसार राज्यात स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठे स्थापन करण्यात येत आहेत. या मार्गदर्शक सूचनांमध्ये सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती. यासाठी दिनांक २५ ऑगस्ट, २०१५ रोजीच्या, शासन निर्णयान्वये श्री. अरुण बोंगीरवार, माजी मुख्यसचिव, यांच्या अध्यक्षतेखाली द्विसदस्य समिती गठीत करण्यात आली होती. त्यानुसार बोंगीरवार समितीने आपला अहवाल शासनास सादर केला आहे. बोंगीरवार समितीने केलेल्या शिफारशी विचारात घेऊन मागदर्शक सूचनांमध्ये खालील प्रमाणे सुधारणा करण्याचा निर्णय शासनाने घेतलेला आहे.

**शासन निर्णय:-**

राज्यात स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठांची स्थापना करण्यासाठी, त्यांच्या कामकाजाचे व कार्याचे विनियमन करण्यासाठी आणि त्यांच्याशी संबंधित किंवा तद्नुषंगिक बाबीसाठी सुधारित मार्गदर्शक सूचना सोबत जोडल्याप्रमाणे निर्गमित करण्यात येत आहेत.

१) सदर शासननिर्णयाची अंमलबजावणी तात्काळ प्रभावाने लागू होईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०१९०११९११००१६९६०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

SIDDHARTH KHARAT

Digitally signed by SIDDHARTH KHARAT
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=6f8cb55012423727bece629d954713c1ec2962a9ca9b9096431 70e56321cfd24, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=22c1b7c1413e77554a8e64cbc60b74fb6471605c32acf8b 9b51b2b018efdc0b, ou=H AND TED, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=SIDDHARTH KHARAT
Date: 2019.01.19 12:56:20 +05'30'

**( सिद्धार्थ खरात )**
सह सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति:-**

१. मा.राज्यपाल तथा विद्यापीठांचे कुलपती यांचे सचिव
२. मा.मुख्यमंत्री, यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई

३. मा.मंत्री, (उ.व तं.शि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा.राज्यमंत्री, (उ.व तं.शि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा.मुख्यसचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
६. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधानपरिषद, विधानमंडळ, मुंबई
७. सर्व विधानसभा/विधानपरिषद सदस्य, विधानमंडळ, मुंबई
८. मा.अपर मुख्य सचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
९. मा.अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
१०.मा.प्रधान सचिव, कृषि विभाग, मंत्रालय, मुंबई
११.मा.प्रधान सचिव, अल्पसंख्यांक विभाग, मंत्रालय, मुंबई
१२.मा.प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१३.मा.प्रधान सचिव, वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
१४.मा.प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१५.सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
१६.मा.महा अधिवक्ता, मुंबई उच्च न्यायालय, मुंबई
१७.मा.उच्च न्यायालयाचे सरकारी अधिवक्ता, मुंबई/औरंगाबाद/नागपूर
१८. सर्व अकृषि विद्यापीठांचे कुलगुरू,
१९.सर्व कृषि विद्यापीठांचे कुलगुरु
२०.संचालक, उच्च शिक्षण महाराष्ट्र राज्य पुणे
२१.संचालक, (व्यावसायिक शिक्षण) संचालनालय, मुंबई
२२.संचालक, (प्रशिक्षण) संचालनालय, मुंबई
२३.संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, मुंबई
२४.संचालक, कला संचालनालय, मुंबई
२५.निवडनस्ती विशि-४

राज्यात स्वयंअर्थसहाय्यित विद्यापीठांची स्थापना करण्याची तरतूद करण्यासाठी, त्यांच्या कामकाजाचे व कार्याचे विनियमन करण्यासाठी आणि त्यांच्याशी संबंधीत किंवा तदनुषंगिक बाबींसाठी तरतूद करण्याकरीता सुधारित मार्गदर्शक सूचना.

स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठ स्थापन करण्यासाठी विहित केलेल्या मुख्य मार्गदर्शक सूचना खालीलप्रमाणे आहेत.

१. या नियमावलीस, महाराष्ट्र स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठे (स्थापना व विनियमन) नियमावली/ मार्गदर्शक प्रणाली असे म्हणावे.

२. विद्यापीठ अनुदान आयोगाच्या २००३ च्या रेग्युलेशन मधील ३.१ नुसार, प्रत्येक स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठ, स्वतंत्र विधेयकाद्वारे स्थापन होईल.

३. खालील अधिनियमान्वये स्थापित झालेली कोणतीही स्वयं अर्थसहाय्यित शैक्षणिक संस्था राज्यात स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठाची स्थापना करू शकेल.

(एक) मुंबई सार्वजनिक विश्वस्त व्यवस्था अधिनियम, १९५० अन्वये नोंदणी केलेली विश्वस्त व्यवस्था किंवा सोसायटी नोंदणी अधिनियम, १८६०, अन्वये नोंदणी केलेली संस्था.

(दोन) भारतीय न्यास अधिनियम, १८८२ अन्वये नोंदणीकृत असलेली कोणतीही सार्वजनिक विश्वस्त व्यवस्था.

(तीन) कंपनी अधिनियम, १९५६ च्या कलम २५, कंपनी अधिनियम, २०१३ मधील कलम ८ खाली नोंदणीकृत असलेली कोणतीही शैक्षणिक संस्था/स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठ.

(चार) सध्या अस्तित्वात असलेली सक्षम महाविद्यालये/शैक्षणिक संस्था यांच्याकडे किमान ५ शैक्षणिक पदव्युत्तर विभाग कार्यरत आहेत, त्यांना इतर अटींची पूर्तता होत असल्यास, स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठांमध्ये रूपांतर करता येऊ शकेल.

४. स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठाची उद्दिष्टे पुढील प्रमाणे असतील:-

(I) उच्च व तंत्र शिक्षणामध्ये अभियांत्रिकी तंत्रज्ञान, व्यवस्थापन, व्यवसाय व वाणिज्य, उपयोजित व सृजनात्मक कला, व्यावसायिक शिक्षण, प्रसारमाध्यम, माहिती व दळणवळण तंत्रज्ञान व स्वभावत: शिक्षण व त्यांच्या अध्ययनाच्या विविध विद्याशाखा विषयक अभ्यासक्रम व विकास या सारख्या मुक्त कला, मानव्य विद्या, सामाजिक शास्त्रे, जीवन शास्त्रे आणि जैव तंत्रज्ञाने, लघुतम (नॅनो) शास्त्रे व तंत्रज्ञाने, व्यावसायिक विद्याशाखा, क्रीडा, औषध आणि मानवंश शास्त्र, शरिराच्या हालचाल यंत्रणेचा अभ्यास आणि बायोमेकॅनिक्स, सामान्य सिध्दांत आणि प्रशिक्षण पध्दती, अभासी ऑनलाईन विद्यापीठ ज्यामध्ये E-PG डिप्लोमा, ई-एज्युकेशन इत्यादी, वस्त्रोद्योगाशी संबंधित अभ्यासक्रम, कृषि, पशु संवर्धन, दुग्ध व्यवसाय व मत्स्य संवर्धन या विभागाच्या सहमतीने आंतरशाखिय अभ्यासक्रम, यांचा अंर्तभाव करुन अध्ययन, अध्यापन, सक्षमता, कौशल्य विकास आणि संशोधन व विकास यांची तरतूद करणे;

(II) उच्च व तंत्र शिक्षण, कला, क्रिडा, संस्कृती, फिल्म, अवकाश तंत्रज्ञान, सागरी संशोधन या विषयांमधील शिक्षण, अध्यापन व प्रशिक्षण देणे, आणि संशोधनासाठी तरतूद करणे.

(III) उच्चस्तरीय अशी बोधात्मक, भावात्मक आणि मनोकारक (मस्तक, हृदय आणि हस्त) क्षमता निर्माण करणे;

(IV) उच्च प्रतीची बौध्दिक क्षमता निर्माण करणे;

(V) विकास व सामाजिक पुनर्रचना आणि परिवर्तन याकरिता नवीन मार्ग शोधून त्याद्वारे सर्जनशीलता, अभिनव उपक्रम आणि उद्यमशीलता यांना चालना देण्यासाठी नवनवीन शैक्षणिक कार्यक्रम निर्माण करणे आणि त्यांचा जास्तीत जास्त चांगला वापर करणे;

(VI) शिक्षण आणि विकास यासाठी अत्याधुनिक सुविधा निर्माण करणे;

(VII) अध्यापन व संशोधन करणे आणि निरंतर गुणवत्ताशिक्षणाचे कार्यक्रम उपलब्ध करून देणे;

(VIII) विज्ञान व तंत्रज्ञान या विषयात आणि सामाजिक व आर्थिक विकासात, संशोधन व विकास करण्याकरीता आणि ज्ञानाचे आदानप्रदान व उपयोजन करण्याकरीता, उत्कृष्ट केंद्रांची निर्मिती करणे;

(IX) व्यक्तिगत आणि २१ व्या शतकातील समाज यांच्याकरिता, अध्ययन, अध्यापन, संशोधन, मूल्यमापन, विकास, संघटन व निर्मिती करणे व सामाजिक व आर्थिक संपत्तीचे व्यवस्थापन करणे आणि यासाठी आधुनिक आणि आधुनिकेत्तर प्रक्रिया, यंत्रणा व तंत्रज्ञान यांचा वापर करणे;

(X) उद्योग आणि सार्वजनिक संघटना आणि समाज यांना व्यावसायिक व विकासविषयक सेवा पुरविणे;

(XI) नवीन व नव्याने उदयाला येत असलेल्या क्षेत्रांमध्ये अभिनव कार्यक्रमांसह उच्च शिक्षणाचे कार्यक्रम, अभ्यासक्रम सुरू करणे;

(XII)भारतातील आणि परदेशातील इतर उच्च शिक्षण व संशोधन संस्थांशी संबंध, सहयोग आणि भागीदारी प्रस्थापित करणे;

(XIII) परीक्षांच्या आधारे, किंवा मूल्यमापनाच्या अन्य कोणत्याही पध्दतीच्या आधारे पदव्या, पदविका, प्रमाणपत्रे आणि इतर विद्याविषयक विशेषोपाधी देण्याचे सुरू करणे;

(XIV) अभिनव दृष्टिकोन प्रस्थापित व्हावा म्हणून, विद्याविषयक संरचना-पध्दती, अध्ययन समय-चौकट यांमध्ये एकसंधता निर्माण करणे आणि सर्जनशीलता व उद्यमशीलता यांचे पोषण करून तसेच त्यांची योग्य जोपासना होण्यासाठी कार्यक्षम व मूल्यमापन प्रक्रीया सातत्याने करत राहणे;

(XV) शासनाने सुचवलेल्या अन्य कोणत्याही उद्दिष्टांचा पाठपुरावा करणे;

(XVI) विद्यापीठाने प्रदान केलेल्या पदव्या, पदविका, प्रमाणपत्रे आणि इतर विद्याविषयक विशेषोपाधी या अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेने किंवा राष्ट्रीय अध्यापक शिक्षण परिषद अधिनियम, १९९३ अन्वये स्थापन करण्यात आलेल्या, राष्ट्रीय अध्यापक शिक्षण परिषदेने किंवा विद्यापीठ अनुदान आयोग अधिनियम, १९५६ अन्वये स्थापन करण्यात आलेल्या विद्यापीठ अनुदान आयोगाने किंवा

औषधशास्त्र अधिनियम, १९४८ अन्वये घटित करण्यात आलेल्या भारतीय औषधशास्त्र परिषदेने किंवा अधिवक्ता अधिनियम, १९६१ अन्वये घटित करण्यात आलेल्या भारतीय विधि परिषदेने किंवा, यथास्थिती, इतर कोणत्याही सांविधिक मंडळाने निर्धारित केलेल्या दर्जापेक्षा कमी दर्जाच्या नसतील, याची सुनिश्चिती करणे.

५. स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठ स्थापन करण्यास इच्छुक असलेले परिच्छेद ३ मध्ये नमूद केल्यानुसार स्थापन झालेले कोणतेही प्रायोजक मंडळ (शैक्षणिक कार्यक्रम चालविणारी कोणतीही खाजगी संस्था धरून) रू.२५ लक्ष इतक्या संस्करण फीसह, विद्यापीठाची स्थापना करण्याबाबतचा प्रस्ताव अंतर्भूत असणाऱ्या सविस्तर प्रकल्प अहवालासह शासनाकडे अर्ज करील, हा अर्ज सोबत जोडलेल्या नमून्यामध्ये सादर करणे आवश्यक राहिल.

६. सविस्तर प्रकल्प अहवालात पुढील तपशिलाचा अंतर्भाव असेल:-

(एक) कलम (५) अन्वये अर्ज सादर करणाऱ्या प्रायोजक मंडळाचे नोंदणी प्रमाणपत्र, त्याची घटना व त्याचे उप-विधी यांच्या प्रतींसह त्याची तपशीलवार माहिती;

(दोन) शैक्षणिक कार्यक्रम चालविणाऱ्या विद्यमान खाजगी संस्थांच्या बाबतीत मागील तीन वर्षांचे लेखापरिक्षित लेख्यांसह, प्रायोजक मंडळाच्या, आर्थिक साधन स्त्रोतांसंबंधीची माहिती किंवा नव्याने स्थापन झालेल्या प्रायोजक मंडळाच्या बाबतीत सनदी लेखापालाकडून यथोचितरित्या प्रमाणित करण्यात आलेली आर्थिक साधनस्त्रोत निर्माण करण्यासाठीची योजना.

(तीन) प्रस्तावित विद्यापीठाचे नाव, ठिकाण आणि मुख्यालय;

(चार) विद्यापीठाची उद्दिष्टे

(पाच) जमिनीची उपलब्धता तसेच त्यावर इमारती व पायाभूत सुविधा अगोदरपासूनच असतील तर त्यांचा सविस्तर तपशील; किंवा स्थानिक आणि राज्यस्तरीय संस्था यांना लागू असलेल्या विनियमांचे अनुपालन करून, जमीन संपादनाकरिता, इमारतीच्या बांधकामाकरिता व पायाभूत सुविधा प्रस्थापित करण्याकरिता बृहत योजना;

(सहा) शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी असल्यास त्यांच्यासह, प्रायोजक मंडळाकडे कामाचा निपटारा करण्यासाठी असलेली प्रस्तावित योजना व विद्याविषयक सुविधांची उपलब्धता;

(सात) विद्यापीठ कार्यरत होण्यापूर्वी इमारती बांधणे, संरचनात्मक सोयींचा व पायाभूत सुविधांचा विकास करणे आणि साधनसामग्री मिळविणे, इत्यादी यांसारख्या विद्यापीठ क्षेत्र विकासाच्या योजनांचा तपशील आणि पहिल्या पाच वर्षामधील कार्यक्रमांची टप्पानिहाय रुपरेषा

(आठ) पुढील पाच वर्षासाठी प्रस्तावित केलेला भांडवली खर्चाचा टप्पानिहाय विनियोग आणि त्याचे वित्तीय स्त्रोत;

(नऊ) विद्यापीठाने हाती घेण्याचे प्रस्तावित केलेल्या, अभ्यास आणि संशोधन कार्यक्रमांचे स्वरूप व प्रकार आणि राज्याची विकासविषयक उद्दिष्ट व रोजगारविषयक गरजा यांच्या संदर्भात असलेली त्यांची सुसंगतता आणि पहिल्या पाच वर्षांमधील, अशा कार्यक्रमांची टप्पानिहाय रुपरेषा आणि अभ्यासक्रमनिहाय प्रवेशक्षमतेची लक्ष्ये;

(दहा) प्रायोजक मंडळाच्या अधिपत्याखाली असणाऱ्या संबंधीत विद्याशाखेतील अनुभवी व तज्ञ व्यक्ती

(अकरा) ज्या सुविधा देण्याचे व अभ्यासक्रम व संशोधन कार्य सुरू करण्याचे प्रस्तावित केले असेल त्यांचे स्वरूप;

(बारा) अभ्यासक्रमनिहाय किंवा उपक्रमनिहाय अंदाजित आवर्ती खर्च, वित्तीय स्त्रोत आणि प्रत्येक विद्यार्थ्यांवरील अंदाजित खर्च;

(तेरा) साधनसंपत्ती एकत्रित करून कामी लावण्याची योजना आणि त्यासाठी येणारा भांडवली खर्च आणि अशा साधनसंपत्तीच्या परतफेडीची रीत;

(चौदा) विद्यार्थ्यांकडून घेतली जाणारी फी, विद्यापीठाच्या उद्दिष्टांशी संबंधीत सल्लाविषयक सेवांकडून आणि इतर उपक्रमांकडून अपेक्षित असलेला महसूल तसेच अन्य अपेक्षित उत्पन्न यांच्यामार्फत, अंतर्गतरीत्या निधी उभारण्यासाठी केलेली योजना;

(पंधरा) विद्यापीठातील अभ्यासक्रमांसाठी प्रवेश देण्यासाठी विद्यार्थ्यांची निवड करण्यासाठी अनुसरावयाची प्रस्तावित पध्दती;

(सोळा) विद्यापीठाने स्थानिक गरजांशी संबंधित काही कार्यक्रम राबविण्याचे प्रस्तावित केले आहे किंवा कसे, असल्यास असे उद्दिष्ट साध्य करण्यासाठी, विद्यापीठाने हाती घ्यावयाचे विशेषीकृत अध्यापन, प्रशिक्षण किंवा संशोधन विषयक उपक्रमांचे स्वरूप;

(सतरा) विद्यापीठाने शेतकरी, शेतमजूर, इतर कामगार, महिला आणि उद्योग यांच्या लाभासाठी काही कार्यक्रम सुरू करण्याचे प्रस्तावित केले आहे किंवा कसे. असल्यास, त्याचा तपशिल द्यावा;

(अठरा) खेळ व क्रिडा प्रकारासाठी तसेच राष्ट्रीय छात्र सेना, राष्ट्रीय सेवा योजना इत्यादीसारख्या पाठ्येत्तर कार्यक्रमासाठी उपलब्ध असलेली किंवा निर्माण करण्याचे प्रस्तावित केलेली क्रिडांगणे व इतर सुविधा यांचा तपशिल

(एकोणविस) विद्या विषयक मुल्यमापन करण्यासाठी प्रस्तावित केलेली व्यवस्था;

(वीस) प्रस्तावित विद्यापीठ स्थापन करण्याच्या आवश्यकतेचे समर्थन

(एकविस) विनियामक मंडळाची मानके अनुसरण्यासंबंधातील बांधीलकी;

(बाविस) विहित करण्यात येतील असे अन्य तपशिल;

(तेविस) प्रायोजक मंडळास देणे आवश्यक वाटेल असा अन्य तपशिल.

७. (७.१) विद्यापीठाच्या स्थापनेबाबतचा प्रस्ताव आणि सविस्तर प्रकल्प अहवाल प्राप्त झाल्यावर, शासनाने गठीत केलेल्या, पुढील सदस्यांचा समावेश असलेल्या समितीकडून, शासन सविस्तर प्रकल्प अहवालाची तपासणी करून घेईल.

ही समिती पुढील सदस्यांची मिळून बनलेली असेल:-

(एक) प्रधान सचिव किंवा सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग... पदसिध्द अध्यक्ष;

(दोन) प्रधान सचिव किंवा सचिव, संबंधीत विभाग... सदस्य;

- वित्त विभाग;
- नियोजन विभाग;
- महसूल व वन विभाग;

(तीन) शासनाने नामनिर्देशित केलेली शक्यतो संबंधीत विषयाच्या विद्यापीठाचा कुलगुरू. सदस्य;

(चार) शासनाने नामनिर्देशित केलेले तीन विख्यात विद्वान, संशोधक किंवा तज्ञ व्यक्ती. सदस्य;

(पाच) उच्च व तंत्र शिक्षण विभागातील उपसचिव या दर्जापेक्षा कमी दर्जा नसलेला अधिकारी सदस्य-सचिव;

(सहा) प्रकल्पाशी संबंधीत विषयातील सखोल ज्ञान व अनुभव असलेल्या तज्ञ व्यक्तीला निमंत्रीत म्हणून समितीच्या बैठकीला बोलविता येईल. अशा निमंत्रित व्यक्तीस चर्चेत भाग घेता येईल, मात्र त्याला मतदानाचा अधिकार असणार नाही.

(७.२) समितीच्या पदसिध्द सदस्यांव्यतिरिक्त इतर सदस्यांना, शासनाने यासंबंधात काढलेल्या आणि राजपत्रात प्रसिध्द केलेल्या आदेशात विनिर्दिष्ट केले असेल असे मानधन आणि भत्ते मिळतील आणि अशा कालावधीपर्यंत ते पद धारण करतील.

(७.३) समिती पुढील निकषांवर प्रस्तावाची आणि प्रकल्प अहवालाची छाननी करील:-

(I) प्रायोजक मंडळाची आर्थिक सुस्थिती आणि भत्ता तसेच प्रस्तावित विद्यापीठाच्या पायाभूत सुविधा उभारण्यासाठी त्या मंडळाकडे असलेली क्षमता:-

(II) प्रायोजक मंडळाची पार्श्वभूमी, म्हणजेच शिक्षण क्षेत्रातील मंडळाची विशेष तज्ञता व अनुभव, त्याचा सर्वसाधारण लौकिक इत्यादी आणि विनियामक मंडळाची मानके अनुसरण्यासंबंधातील त्याची बांधिलकी;

(III) शिकवावयाच्या शैक्षणिक कार्यक्रमांची गुणवत्ता म्हणजेच समकालिन गरजांनुसार मनुष्यबळ विकसित करण्याची शैक्षणिक कार्यक्रमांची सक्षमता आहे; आणि त्यात उद्दिष्टांमध्ये व्याख्या, केल्यानुसार कार्यक्रमाच्या नावीन्याचा अंतर्भाव आहे.

(७.४) पोट-कलम (३) खालील प्रस्ताव आणि प्रकल्प अहवाल यांची छाननी करतांना, समितीस, प्रायोजक मंडळाकडून, योग्य वाटेल अशी अन्य माहिती मागविता येईल.

(७.५) समितीस, सविस्तर प्रकल्प अहवालात उणीवा आढळल्यास त्याबाबत बदल सुचविता येतील आणि प्रायोजक मंडळाने विनिर्दिष्ट कालावधीत त्यावर विचार करून त्यांचे अनुपालन करण्यासाठी, ते त्या मंडळास कळविता येतील.

(७.६) समिती, प्राप्त झालेल्या सर्व अर्जाची तपासणी करून, तीचा अहवाल दोन महिन्यांच्या कालावधीत शासनाला सादर करील;

परंतु, कलम (७.५) खाली दिलेल्या सूचना कोणत्याही असल्यास, त्यांचे अनुपालन करण्यासाठी काही कालावधी दिलेला असल्यास, तो कालावधी अहवाल सादर करण्यासाठी वाढवून देण्यात येईल;

(७.७) परंतु, आणखी असे की, शासन समितीला अहवाल सादर करण्यासाठी दिलेला कालावधी हा वेळोवळी सहा महिन्यांपेक्षा अधिक नसेल इतक्या एकंदर कालावधीसाठी वाढवून देऊ शकेल.

८. कलम ७ अन्वये घटीत केलेल्या समितीचा अहवाल मिळाल्यानंतर विद्यापीठ स्थापन करणे उचित असल्याबाबत जर राज्य शासनाची खात्री पटली तर, त्यास प्रायोजक मंडळाला इरादापत्र देता येईल.; आणि पुढील बाबी करण्यास फर्मावता येईल:-

(एक) दाननिधी स्थापन करणे:- स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठ रु.दहा कोटींचा दाननिधी, स्थापन करेल.

(दोन) असे प्रायोजक मंडळ म्हणून विचार करता येणे शक्य व्हावे याकरीता अशा प्रायाजक मंडळाच्या मालकी हक्काची व ताब्याची पुष्टी करणारे किमान १०-२५ एकर जागेची उपलब्धता दर्शविणारे दस्तऐवज सादर करणे, जसे,-

| | |
|---|---|
| अ.ग्रामिण क्षेत्र | २५ एकर; |
| ब.तहसिल किंवा जिल्हा मुख्यालय | १५ एकर; |
| क. विभागीय मुख्यालय | १० एकर; |
| ङ सर्व महानगर प्रदेश विकास प्राधिकरण प्रदेश हद्द (उदा.एमएमआरडीए, पीएमआरडीए इ.) | १० एकर; |

स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठ स्थापनेचा प्रस्ताव (स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार, शैक्षणिक, प्रशासकीय, क्रीडा सुविधा, वसतीगृह इत्यादी सोयी- सुविधा उपलब्ध होतील) महाराष्ट्र प्रादेशिक आणि नगर नियोजन अधिनियम, १९६६ / विकास नियंत्रण नियमावली/नगर रचना विभाग यांनी विहित केलेल्या नियमानुसार असणे बंधनकारक राहील.

या प्रयोजनार्थ लागणारी जमीन प्रायोजक मंडळाच्या मालकीची किंवा ३० वर्षाच्या भाडेतत्वावर असली पाहिजे. सदर जमीनीचे हस्तांतरण करता येणार नाही. विद्यापीठ स्थापनेच्या वेळेस ती जमीन खरेदी केलेली किंवा भाडेतत्वावर घेतलेली असावी.

स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठ स्थापन करण्यासाठी संस्थेकडे स्वत:च्या मालकीची किंवा किमान ३० वर्ष संस्थेकडे भाडे तत्वावरील जमीन असेल, अशा संस्था देखील स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठ स्थापन करण्यासाठी आवश्यक दस्ताऐवज सादर करतील.

(तीन) विद्यापीठामध्ये देण्यात यावयाचा प्रवेश हा, काटेकोरपणे गुणवत्तेच्या आधारे देण्यात येईल.

(चार) विद्यापीठातील प्रवेशाकरीता लागणारी गुणवत्ता ही, एकतर अर्हता परिक्षेमध्ये मिळविलेले गुण किंवा श्रेणी आणि पाठयांतर्गत व पाठयेत्तर कार्यक्रमांमध्ये मिळविलेले नैपुण्य यांच्या आधारे किंवा तशा प्रकारचे अभ्यासक्रम चालविणाऱ्या एखाद्या विद्यापीठ अधिसंघाने घेतलेल्या किंवा राज्याचा अन्य कोणत्याही अभिकरणाने घेतलेल्या राज्यस्तरीय प्रवेश परीक्षेमध्ये मिळविलेले गुण किंवा श्रेणी यांच्या आधारे निर्धारित करता येईल; परंतु व्यावसायिक व तांत्रिक अभ्यासक्रमांमधील प्रवेश हा केवळ परीक्षेमार्फतच देण्यात येईल;

(पाच) राज्य शासनाच्या, प्रचलित धोरणानुसार महाराष्ट्र राज्यामध्ये विविध सामाजिक प्रवर्गासाठी अस्तित्वात असलेले आरक्षण अनुसूचित जाती (SC) १३%, अनुसुचित जमाती (ST)७%,विमुक्त जाती (V.J.A)३% भटक्या जमाती, (N.T.B)२.५% भटक्या जमाती, (N.T.C)३.५%, भटक्या जमाती (N.T.D)२%, इतर मागासवर्ग (O.B.C)१९%, विशेष मागासप्रवर्ग (S.B.C)२% आणि सामाजिक व आर्थिक मागास प्रवर्ग (S.E.B.C) १६% असे एकूण ६८% आरक्षण ठेवले आहे.

(सहा) सदरहू प्रवेश प्रक्रिया ही राज्य शासनाच्या आरक्षण धोरणास अनुसरुन राबविण्यात यावी.

(सात) शैक्षणिक वर्ष सुरु होताना एकूण प्रवेश क्षमतेच्या ४०% जागा महाराष्ट्रामधील अधिवास असणाऱ्या विद्यार्थ्यांसाठी आरक्षित असतील. तथापि, विदेशी व आंतरराष्ट्रीय विद्यापीठ अथवा इतर अशा प्रकारच्या विद्यापीठाशी संलग्न असणाऱ्या विद्यापीठांमध्ये शासन ही मर्यादा शिथील करु शकेल. अल्पसंख्याक दर्जा प्राप्त विद्यापीठांसाठी प्रवेशाचे आरक्षण लागू राहणार नाही.

(आठ) राष्ट्रीय अल्पसंख्याक शैक्षणिक संस्था अधिनियम, २००४ हा अधिनियम संपूर्ण देशात लागू आहे. या अधिनियमातील तरतूदी राज्यातील स्वयं अर्थसहाय्यित अल्पसंख्याक विद्यापीठांना लागू राहतील.

(नऊ) (i) शिक्षण शूल्क (fee) किंवा इतर खर्चापोटी शासनाकडून कोणत्याही स्वरुपाची प्रतीपूर्ती करण्यात येणार नाही.

(ii) राज्यातील सर्व स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठांच्या शुल्क निर्धारणासाठी समान नियमावली विधी व न्याय विभागाच्या सल्ल्याने तयार करण्यात येईल.

(iii) तथापि, शुल्क निश्चिती समिती (Fee Fixation Committee):- विद्यापीठामध्ये पारदर्शकता आणण्यासाठी विविध उपक्रमांसाठी शुल्क आकारण्याच्या अनुषंगाने पुर्ण स्वायतत्ता असेल. प्रत्येक विद्यापीठाला शुल्क ठरविण्यासाठी Fee fixation committee ज्या मध्ये संचालक मंडळ Academic

council तसेच विद्यापीठा व्यतिरीक्त सदस्य असतील, त्यांच्या मार्फत शुल्क निश्चिती करण्यात येईल.

सदर समितीचा अध्यक्ष हा संचालक मंडळाचा सदस्य असेल. या व्यतिरिक्त सदरहू समितीमध्ये खालील सदस्यांचा समावेश असेल.

१) माजी कुलगुरू. ( राज्यातील सार्वजनिक विद्यापीठाचे अथवा केंद्रीय विद्यापीठाचे )

२) सनदी लेखापाल (किमान १० वर्षाचा अनुभव)

३) जिल्हा/ उच्च न्यायालयाचे माजी न्यायाधीश

४) पद्मभुषण प्राप्त व्यक्ती

शुल्क नियमन समिती मधील सर्व सदस्यांचे वेतन व भत्ते इत्यादींची जबाबदारी स्वयं अर्थसहाय्यीत विद्यापीठांवर राहील. शासनावर कोणताही आर्थिक भार येणार नाही. शुल्क निश्चिती समितीने स्वयं अर्थसहाय्यीत विद्यापीठामधील विद्यार्थ्यांच्या प्रवेशासाठी व इतर शैक्षणिक बाबींसाठी ठरविलेले शुल्क शासनास कळविणे बंधनकारक राहील.

(दहा) एखाद्या संस्थेने स्वयं अर्थ सहाय्यित विद्यापीठामध्ये सामील होण्यासाठी अर्ज केल्यास त्या संस्थेमध्ये शासकीय अनुदान तत्वावर सुरु असणारे सर्व अभ्यासक्रमांना यापुढे अनुदान मिळणार नाही. तसेच सदर संस्थेतील शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचारी यांना शासनाकडून मिळणारे अनुदान व इतर लाभ स्वयं अर्थसहाय्यीत विद्यापीठ स्थापन झाल्याच्या दिनांकापासून आपोआप बंद होतील.

(अकरा) विद्यापीठ अनुदान आयोग किंवा कायद्याद्वारे स्थापन केलेले अन्य कोणतेही वैधानिक मंडळ विहित करील अशा इतर शर्तीची पूर्तता करणे आणि विहित करील अशी अन्य माहिती पुरविणे;

(बारा) जर यापूर्वी करण्यात आले नसेल तर, प्रशासनिक प्रयोजनांसाठी आणि विद्याविषयक कार्यक्रम आयोजित करण्यासाठी, व्याप्तिक्षेत्राच्या किमान १५,००० चौरस मीटर क्षेत्रावर बांधकाम करणे;

(तेरा) कमीत-कमी १० लाख रुप़ये एवढया रकमेची किंवा विनियामक मंडळाच्या मानकानुसार जी अधिक असेल एवढया रकमेची पुस्तके किंवा जर्नल्स यांची खरेदी करणे आणि समकालीन अध्यापन आणि संशोधनाकरीता पुरेशा प्रमाणात ग्रंथालयाला सुविधा देण्यासाठी पुस्तके, जर्नल्स, संगणक, ग्रंथालय नेटवर्कींग आणि इतर सुविधा यांवर ५० लाख रुपयांपेक्षा कमी नसेल किंवा विनियामक मंडळाच्या मानकानुसार जी अधिक असेल एवढी रक्कम पहिल्या तीन वर्षांमध्ये गुंतवणुक करण्याची हमी देणे;

(चौदा) २० लाख रुपये एवढया किंमतीची किंवा विनियामक मंडळाच्या मानकानुसार उपकरणे, संगणक, फर्निचर, इतर स्थावर व जंगम मालमत्ता खरेदी करणे आणि पायाभूत सुविधा देणे आणि एक कोटी रुपये एवढया रकमेपेक्षा कमी असणार नाही एवढी रक्कम किंवा विनियामक मंडळाच्या मानकानुसार जी अधिक असेल एवढी उपकरणे संगणक, फर्निचर, इतर स्थावर व जंगम मालमत्ता आणि पायाभूत सुविधा पहिल्या पाच वर्षांमध्ये मिळविण्याची हमी देणे :

(पंधरा) विद्यापीठांव्दारे सुरु करण्यात आलेल्या प्रत्येक विभागात किंवा विद्याशाखेमध्ये कमीत-कमी एक प्रध्यापक , दोन सहयोगी प्राध्यापक आणि आवश्यक पूरक कर्मचारी वर्गासह पुरेश्या प्रमाणात सहायक प्राध्यापक यांच्या नियुक्तीची हमी देणे:

(सोळा) नियामक मंडळाने घालून दिलेल्या मानकाप्रमाणे विद्यार्थ्यांच्या हिताकरिता चर्चासत्र, वादविवाद स्पर्धा, सामान्यज्ञान तपासणी कार्यक्रमासारखे अभ्यासक्रमाला पूरक असे कार्यक्रम आणि खेळ, क्रिडा राष्ट्रीय सेवा योजना, राष्ट्रीय छात्रसैनिक दल यांसारखे पाठ्येत्तर कार्यक्रम हाती घेण्याची हमी देणे;

(सतरा) विद्यापीठाच्या कर्मचाऱ्यांसाठी भविष्य निर्वाह निधी स्थापन करण्याची आणि त्यांच्यासाठी कल्याणकारी कार्यक्रम हाती घेण्याची हमी देणे;

(अठरा) विद्यापीठ अनुदान आयोग, अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषद किंवा संघ राज्य किंवा राज्य शासनाच्या कायद्यान्वये स्थापन केलेली अन्य कोणत्याही सांविधिक मंडळाद्वारे विहित करण्यात येतील अशा इतर अटी पूर्ण करणे आणि अशी इतर माहिती पुरविण्याची तरतूद करणे;

(एकोणविस) विद्यापीठ स्थापन झाल्यापासून त्याची पंधरा वर्षे पूर्ण होण्यापूर्वी ते विसर्जित करण्यात येणार नाही याची हमी देणे.

(वीस) विद्यापीठ स्थापन झाल्यापासून १५ वर्षे पूर्ण होण्याअगोदर विसर्जित झाल्यास, विद्यापीठाची असलेली सर्व मत्ता दायित्वाशिवाय आणि सर्व भारापासून मुक्त अशा स्वरुपात शासनाकडे निहित होईल.

(एकविस) विद्यापीठ अधिनियमातील तरतुदींचे पालन न करता आल्यामुळे अथवा अन्य कारणामूळे विद्यापीठाचे १५ वर्षानंतर विसर्जन झाले तर स्वयं अर्थसहाय्यीत विद्यापीठे, सर्व मत्ता प्रायोजक मंडळाला परत करेल. मात्र विद्यापीठ बंद झाल्यानंतर सदरहू जागेचा वापर प्रायोजक मंडळ/संस्थेकडून केवळ शैक्षणिक प्रयोजनार्थ करण्यात येईल. अन्य प्रयोजनार्थ वापर करता येणार नाही.

(बाविस) विद्यापीठ विसर्जीत करावयाचे झाल्यास:-

अ) प्रवेशित विद्यार्थी पास होईपर्यंत चालू ठेवणे बंधनकारक राहील.

ब) कर्मचाऱ्यांचे पगार प्रचलित कायद्याप्रमाणे अदा करणे बंधनकारक राहील.

(अ) व (ब) या बाबींची पुर्तता न झाल्यास, सदरहू जागेचा ताबा (सर्व जागा) व इतर मत्तांसह शासन ताब्यात घेईल.

जर विद्यापीठ कोणत्याही अधिनियम, नियम, परिनियम, आदेश, विनियम, यांच्या तरतुदीचे व शासनाच्या व इतर संविधानिक मंडळाच्या निदेशांचे उल्लंघन केल्यामुळे विसर्जित करण्यात आले असल्यास विद्यापीठाची सर्व मत्ता दायित्वमुक्त आणि सर्व भारांपासून मुक्त अशा स्वरुपात शासनाकडे निहित होईल याची हमी देईल.

(९) प्रायोजक मंडळ विनिर्दिष्ट केलेल्या आवश्यकतांची आणि शर्तीची पुर्तता करील आणि इरादापत्र दिल्याच्या दिनांकापासून जास्तीत जास्त एक वर्षाच्या कालावधीत अनुपालन बाबतचा अहवाल शासनाला देईल.

(१०) इरादा पत्र निर्गमित केल्यानंतर एका वर्षाच्या आत प्रायोजक मंडळाने पूर्तता अहवाल सादर करणे आवश्यक राहील. परंतु, प्रायोजक मंडळ एक वर्षाच्या आत पूर्तता अहवाल सादर करण्यास सक्षम नसेल तर अपवादात्मक परिस्थितीत शासनास उक्त कालावधी वाढविता येईल. त्यापुढील प्रत्येक वर्षासाठी १२.५ लक्ष याप्रमाणे (प्रस्तावित संस्करण शुल्काच्या ५०%) शुल्क आकारण्यात यावे. तसेच सदरहू मुदतवाढ एका वर्षासाठी व जास्तीत जास्त दोन वेळा देण्यात येईल. त्यानंतर प्रायोजक मंडळाचे इरादा पत्र आपोआप रद्द होईल.

(११) प्रायोजक मंडळाने परिच्छेद ८ च्या तरतूदींचे पालन केले नाही, तर प्रायोजक मंडळाने सादर केलेला प्रस्ताव फेटाळला जाईल आणि देण्यात आलेले इरादा पत्र काढून घेतल्याचे मानण्यात येईल.

(१२) इरादा पत्रात नमूद बाबींची पूर्तता होत असल्यास, मंत्रिमंडळाच्या मान्यतेसाठी प्रस्ताव सादर करण्यात येईल.

(१३) मंत्रिमंडळाने मान्यता दिल्यानंतर, विधेयक विधानमंडळाच्या दोन्ही सभागृहामध्ये मांडण्यात येईल. विधेयक मान्य झाल्यानंतर स्वंय अर्थसहाय्यित विद्यापीठ स्थापन करण्याबाबतची कार्यवाही करण्यात येईल.

(१४) स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठ स्थापन करण्यासाठी विधानमंडळात सादर करण्यात येणाऱ्या विद्यापीठाच्या अधिनियमांच्या मसूद्यामध्ये इतर बाबींबरोबरच खालील बाबींचा समावेश असेल.

**१.स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठाचे संक्षिप्त नाव :-** स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठाचे नाव व ते कोठे स्थापन करण्यात येणार आहे. याबाबतची माहिती अधिनियमांच्या मसूद्यामध्ये अंर्तभूत असावी. प्रायोजक मंडळाने प्रस्तावित विद्यापीठाचे नाव व जमीन यांच्यात फेरबदल करण्यास परवानगी देण्यात येणार नाही.

**२) व्याख्या:-** अधिनियमांमध्ये आलेल्या संज्ञेचा अर्थ स्पष्ट करणारी व्याख्या.

**३) विद्यापीठाची उद्दीष्टे :-** विद्यापीठ ज्या उद्दिष्टासाठी स्थापन करण्यात येणार आहे. त्या उदिष्टांची सविस्तर माहिती द्यावी.

**४) विद्यापीठ सर्वांना खुले :-** स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठ सर्वांसाठी खुले असावे, याबाबतची सविस्तर तरतूद अधिनियमांमध्ये असावी.

**५) विद्यापीठ स्वयं अर्थसहाय्यित असणे :-** स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठास शासनाकडून कोणत्याही स्वरुपाची आर्थिक मदत मिळण्याचा हक्क असणार नाही, अशी तरतूद अधिनियमांमध्ये असावी.

**६) स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठाचा दाननिधी :-** स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठ रु.दहा कोटींचा दाननिधी स्थापन करेल, याबाबतची तरतूद असावी. यामध्ये दाननिधीचा वापर, दाननिधी मधून मिळणाऱ्या उत्पनाचा वापर कशासाठी करावा, याचा उल्लेख असावा.

**७) स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठाचा सर्वसाधारण निधी :-** स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठाचा सर्वसाधारण निधी स्थापन करण्याबाबतचे स्त्रोत उदा.फी व इतर शुल्के प्राप्त झालेले अंशदान किंवा प्राप्त झालेली कोणतीही देणगी किंवा दान आणि कोणत्याही मार्गाने मिळणारे उत्पन्न याचा उल्लेख असावा. त्याबाबत शासनास वेळोवेळी माहिती सादर करणे बंधनकारक राहील.

**८)सर्व साधारण निधीचा वापर:-** स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठांनी स्थापन केलेल्या सर्वसाधारण निधीचा वापर कोणत्या उद्देशासाठी करता येईल याबाबतचा तपशील अधिनियमांमध्ये देण्यात यावा.

**९) स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठाचे अधिकारी :-** स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठामध्ये अध्यक्ष, कुलगुरु, कुलसचिव, वित्त व लेखा अधिकारी, परिक्षा नियंत्रक आणि विद्यापीठाचे अधिकारी म्हणून घोषित करण्यात येतील असे इतर अधिकारी यांचा उल्लेख असावा.

**१०)स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठाच्या अध्यक्षांची नियुक्ती :-** अध्यक्षांची नियुक्ती कोणत्या अटी व शर्ती नुसार आणि किती कालावधीसाठी करण्यात येईल, तसेच अध्यक्षांचे अधिकार काय असतील याबाबतचा स्पष्ट उल्लेख अधिनियमांमध्ये करण्यात यावा.

**११) अध्यक्षाला पदावरुन दुर करणे :-** अध्यक्षाला पदावरुन दूर करण्याची कार्यपद्धती व कोणत्या परिस्थितीमध्ये त्याला पदावरुन दुर करता येईल, याबाबत स्पष्ट उल्लेख अधिनियमांमध्ये असावा.

**१२) स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठाच्या कुलगुरुंची नियुक्ती :-** विद्यापीठ कुलगुरु यांची नियुक्ती व पात्रता विद्यापीठ अनुदान आयोगाचे अथवा तत्सम केंद्रीय नियामक मंडळाचे निकषानुसार राहील. आणि त्यांचे पालन करणे सदर विद्यापीठास बंधनकारक राहील.

**१३)कुलगुरुला पदावरुन दुर करणे :-** कुलगुरुला पदावरुन दुर करण्याची कार्यपद्धती व कोणत्या परिस्थिती मध्ये त्याला पदावरुन दुर करता येईल, याबाबत स्पष्ट उल्लेख अधिनियमांमध्ये असावा.

**१४) स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठाच्या कुलसचिवांची नियुक्ती :-** कुलसचिवांच्या नियुक्तीची कार्यपद्धती, अटी व शर्ती कुलसचिवांना देण्यात येणारी वित्त लब्धी तसेच कुलसचिवांची नियुक्ती कोणाकडून करण्यात येईल. याबाबत अधिनियमांमध्ये तरतूद असावी.

**१५) वित्त व लेखा अधिकारी यांची नियुक्ती :-** 'वित्त व लेखा अधिकारी' यांच्या नियुक्तीची कार्यपद्धती, अटी व शर्ती वित्त व लेखा अधिकाऱ्यांना देण्यात येणारी वित्त लब्धी तसेच वित्त व लेखा अधिकाऱ्यांची नियुक्ती कोणाकडून करण्यात येईल, याबाबत अधिनियमांमध्ये तरतूद असावी.

**१६) परीक्षा नियंत्रकाची नियुक्ती :-** 'परिक्षा नियंत्रक' या पदाच्या कर्तव्य व जबाबदाऱ्या तो कोणाच्या अधिक्षनाखाली, निर्देशाखाली व मार्गदर्शनाखाली काम पार पाडील याबाबत तरतूद असावी.

**१७)स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठाचे इतर अधिकारी :-** इतर अधिकाऱ्यांच्या नियुक्तीची कार्यपद्धती, त्यांना अनुज्ञेय असलेली वित्तलब्धी, त्यांच्या सेवा शर्ती याबाबतचा तपशील असावा.

**१८)स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठाची प्राधिकरणे :-** स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठांमध्ये कोणती प्राधिकरणे कार्यरत असतील, उदा.नियामक मंडळ, कार्यकारी समिती, विद्यापरिषद, परिक्षामंडळ इत्यादीबाबतचा उल्लेख अधिनियमांमध्ये असावा.

**१९)** स्वयं अर्थसहाय्यीत विद्यापीठांचे बृहत आराखडे, विद्यापीठांची शैक्षणिक गुणवत्ता, फी, विद्यार्थी, पालक, कर्मचारी इत्यादीं विषयावरील तक्रार निवारण बाबी महाराष्ट्र राज्य उच्च शिक्षण विकास आयोग (आयोग) यांचे समोर ठेवण्यात यावा. स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठातील महिला कर्मचारी/ विद्यार्थींनी यांच्या तक्रार निवारणासाठी विद्यापीठांतर्गत विशाखा समिती स्थापन करण्यात यावी.

**२०)नियामक मंडळ :-** नियामक मंडळांमध्ये कोणकोणते सदस्य असतील, याबाबतचा उल्लेख तसेच नियामक मंडळाचे अधिकार कार्यक्षेत्र याबाबतचा उल्लेख अधिनियमांमध्ये असावा.

**२१)कार्यकारी समिती :-** कार्यकारी समितीमध्ये कोणकोणते सदस्य असतील, याबाबतचा उल्लेख तसेच कार्यकारी समितीचे अधिकार, कार्यक्षेत्र याबाबतचा उल्लेख अधिनियमांमध्ये असावा.

**२२)विद्यापरिषद :-** विद्यापरिषदेमध्ये कोणकोणते सदस्य असतील, याबाबतचा उल्लेख तसेच विद्यापरिषदेचे अधिकार, कार्यक्षेत्र याबाबतचा उल्लेख अधिनियमांमध्ये असावा.

**२३)परिक्षामंडळ :-** परिक्षामंडळामध्ये कोणकोणते सदस्य असतील, याबाबतचा उल्लेख तसेच परिक्षामंडळाचे अधिकार, कार्य आणि मुदत कशी ठरविण्यात येईल. याबाबतचा उल्लेख अधिनियमांमध्ये असावा.

**२४)इतर प्राधिकरणे :-** इतर प्राधिकरणांची रचना, अधिकार, कार्य व मुदत याबाबतचा उल्लेख अधिनियमांमध्ये असावा.

**२५)समित्या:-** विद्यापीठांच्या प्राधिकरणांद्वारे नियुक्त करण्यात येणाऱ्या समित्यांची रचना व कार्य व मुदत याबाबत स्पष्टता असावी.

**२६)विद्यापीठाचे पहिले परिनियम :-** विद्यापीठाचे पहिले परिनियम करण्याचे अधिकार कोणास असतील आणि त्यांना मान्यता देण्याचे अधिकार कोणास असतील, याबाबत अधिनियमांमध्ये तरतूद असावी. तसेच पहिल्या परिनियमांद्वारे कोणकोणत्या बाबींसाठी तरतूद करण्यात येईल, याबाबतचा उल्लेख असावा.

**२७) नंतरचे परिनियम :-** नंतरचे परिनियम तयार करण्याचे अधिकार व मान्यता देण्याचे अधिकार कोणास असतील आणि नंतरच्या परिनियमांद्वारे कोणत्या बाबींसाठी तरतूद करण्यात येईल, याबाबतचा स्पष्ट उल्लेख असावा.

**२८)विद्यापीठाचे पहिले आदेश :-** स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठाचे पहिले आदेश तयार करण्याचे अधिकार व मान्यता देण्याचे अधिकार कोणास असतील आणि विद्यापीठाचे पहिले आदेशांद्वारे कोणत्या बाबींसाठी तरतूद करण्यात येईल, याबाबतचा स्पष्ट उल्लेख असावा.

**२९) नंतर काढलेले आदेश/ विनियम :-** नंतर काढलेले आदेश/विनियम तयार करण्याचे अधिकार व मान्यता देण्याचे अधिकार कोणास असतील आणि नंतर काढलेले आदेश/विनियमांद्वारे कोणत्या बाबींसाठी तरतूद करण्यात येईल, याबाबतचा स्पष्ट उल्लेख असावा.

**३०) स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठातील अभ्यासक्रमाना प्रवेश व आरक्षण:-** स्वयं अर्थ सहाय्यित विद्यापीठातील अभ्यासक्रमाना प्रवेश व आरक्षण याबाबतच्या तरतूदीचा उल्लेख अधिनियमांमध्ये स्पष्टपणे व शासनाच्या धोरणानुसार असावा.

**३१) स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठांच्या परीक्षा:-** स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठातील परिक्षा घेण्याबाबतच्या तरतूदी वेळापत्रक इत्यादींचा उल्लेख अधिनियमांमध्ये असावा.

**३२) स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठांचे निकाल जाहीर करणे :-** स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठांने घेतलेल्या प्रत्येक परीक्षांचा निकाल किती दिवसामध्ये जाहिर करावा याबाबतची तरतूद अधिनियमांमध्ये करण्यात यावी.

**३३) स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठांचे फी रचना :-** स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठांमधील अभ्यासक्रमांसाठी आकाराली जाणारी फी याबाबतचा तपशील व रचना कार्यपद्धती याची माहिती अधिनियमांमध्ये असावी.

**३४) शुल्क निश्चिती समिती :-** स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठातील, शुल्क निश्चिती समितीतील सदस्यांचे अधिकार, कर्तव्ये व पात्रतेची तरतूद याची माहिती अधिनियमांमध्ये असावी.

**३५) स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठांचे महाराष्ट्र शैक्षणिक संस्था ( कॅपिटेशन फी घेण्यास प्रतिबंध अधिनियम, १९८७ ) लागू करणे :-** स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठांसाठी महाराष्ट्र शैक्षणिक संस्था ( कॅपिटेशन फी घेण्यास प्रतिबंध अधिनियम, १९८७) लागू करण्याबाबतच्या तरतूदींचा उल्लेख अधिनयमांमध्ये असावा.

**३६) पदवीचा दर्जा विद्यापीठ अनुदान आयोग वा तत्सम नियामक मंडळाने प्रमाणित केल्याप्रमाणे असणे :-** विद्यापीठाने प्रदान केलेल्या पदव्या,पदविका, प्रमाणपत्र आणि इतर विद्याविषयक विशेषोपाधी या राष्ट्रीय अध्यापक शिक्षण परिषदेने किंवा विद्यापीठ अनुदान आयोग व इतर कोणत्याही नियामक मंडळाने (Apex body) निर्धारित केलेल्या दर्जापेक्षा कमी दर्जाच्या नसतील यांची सुनिश्चिती करणे.

**३७) प्रमाणन :-** स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठास शासनाने वेळोवेळी दिलेल्या सूचनेनुसार व विद्यापीठ नियमानुसार विहित कालावधीत अशा मान्यता प्राप्त करुन घेईल. मात्र ज्या संस्था सुरु आहे त्यांचे

विद्यापीठात रुपांतर करावयाचे असल्यास ती संस्था नॅक / एनबीए दर्जा प्राप्त असणे बंधनकारक राहील.

**३८)स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठांचे वार्षिक अहवाल :-** स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठाचा वार्षिक अहवाल कोणामार्फत तयार करण्यात येईल आणि त्यामध्ये विद्यापीठ उदिष्टांची पूर्तता करण्यासाठी कोणती पावले उचलणार आहे, याबाबतचा उल्लेख वार्षिक अहवालामध्ये असावा.

**३९) स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठांचे वार्षिक लेखे :-** स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठांचे वार्षिक लेखे व ताळेबंद तयार करण्यासंदर्भात व त्याचे लेखापरिक्षण करण्यासंदर्भात अधिनियमांमध्ये स्पष्टता असावी.

**४०)** स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठांचे प्राधिकरणाची कार्यवाही पद रिक्त राहिल्याच्या कारणामुळे विधी अग्राह्य न करणे.

**४१) स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठांचे अभिलेख पुरावा देणे पध्दत :-** स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठांचे दस्त ऐवज, पावती, अर्ज इत्यादी पुरावा म्हणून ग्राह्य धरण्यासाठी कार्यपदध्दती विहीत करण्यात यावी.

**४२) स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठांचे प्रायोजक मंडळाने विद्यापीठ विसर्जित करणे :-** स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठांचे प्रायोजक मंडळाने विद्यापीठ विसर्जित करण्याबाबतच्या तरतूदी, कार्यपध्दती व त्याबाबतच्या कायदेशीर बाबीचा उल्लेख अधिनियमांमध्ये करण्यात यावा.

**४३) शासनाचे अधिकार :-** स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठांसंदर्भात शासनाचे अधिकार काय असतील याबाबतची तरतूद अधिनियमांमध्ये स्पष्टपणे करावी.

**४४) नियम करण्याचा अधिकार :-** स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठांसंदर्भात नियम करण्याबाबतचे अधिकार याबाबतचा उल्लेख अधिनियमांमध्ये असावा.

**४५) अडचणी दुर करण्याचा अधिकार :-** स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठ सदर अधिनियमांन्वये स्थापन झाल्यानंतर काही कायदेशीर अडचणी आल्यास, सदर अडचणी दूर करण्यासंदर्भात कोणती कार्यवाही करण्यात येईल, याचा उल्लेख अधिनयमांमध्ये असावा.

## अर्जाचा नमूना

१. प्रायोजक मंडळाचे नाव

२. प्रायोजक मंडळाचे नोंदणीप्रमाणपत्र, त्याची घटना व त्याचे उपविधी यांच्या प्रती

३. स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठ कोठे स्थापन करण्यात येणार आहे, त्या ठिकाणाचा संपूर्ण पत्ता

४. अर्जा सोबत जागेचा तपशिल जोडला आहे काय

५. प्रकल्प अहवाल जोडला आहे काय

६. विद्यापीठासाठी दान निधी स्थापन करण्याबाबतच्या कार्यवाहीची माहिती

या अर्जान्वये स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठ स्थापन करण्यासाठी मी विनंती अर्ज केला तरी त्यानुसार स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठ स्थापन करण्यास परवानगी देणे आणि त्यानुसार अधिनियम संमत करणे शासनावर बंधनकारक नाही याची मला जाणीव आहे.

सही व शिक्का

सहपत्र :- वरीलप्रमाणे.